प्रकाशक आणि वितरक

साहित्य प्रतिष्ठान

ईमेल - esahity@gmail.com


# प्राजक्त देशमुख

नाशिक

संपर्क- ९८२३११४४४४

ईमेल- deshmukh.praj@gmail.com




-----------------------------


मुखपृष्ठ डिझाईन

मंदार चोळकर

मांडणी व सजावट

भारती सरमळकर

Last Bench Designs.....where creativity begins

हसणं,रुसणं,खेळणं,रडणं,मागणं ह्या पलिकडे लहान मुलांचा बुध्दीबळाचा पट नसतो पण अस वाटत असतांना त्यांच्या मौनाच्या संदर्भातून एक मुकुटधारी वजीर सा-या पटाला अनपेक्षित अर्थ देऊन जातो. चिरनिद्रा घेण्या-यांच्या कपाळावर कधी आठ्या पाहिल्याचे आठवत नाही. आपण चार-दोन ‘दैवी थेंब’ किंवा ‘दैवी शब्द’ त्यांच्या वर फेकुन त्यांना मोक्ष मिळेल अशी समजूत करुन घेतो. कदाचित ती नुसती समजूत नसून सत्य असेलही. पण केवळ हेच कारण ‘ग्रेव्हयार्ड लिटरेचर’ लिहितांना नव्हतं.

मी कधी थडग्यांच्या प्रदेशात ग्रेव्हयार्डात प्रत्यक्ष गेलो नाही, त्या लोकांसंदर्भात माझा खुप अभ्यास आहे अशातला भाग तर मुळीच नाही. फक्त एकदा संध्याकाळी रस्त्यावर एका स्ट्रीट लाईट खाली एका हृदयस्थ मित्रासोबत बोलता बोलता हा विषय आला आणि गेला. पण रात्रभर डोक्यात राहिला आणि सकाळीही.... जसा कधी कधी दिवसासुध्दा स्ट्रीट लाईट चुकुन चालुच राहतो तसा.

काही संभाषणं सरळ असतात, काही मोबाईल, नेट सारखी ‘व्हर्चुअल’.... मग लक्षात आलं तिस-या प्रकारचे संभाषण ‘स्पिरिचुअल संभाषण’. हे आध्यात्मिक, तपश्चर्येनंतरच्या दैवी संभाषणापेक्षा वेगळे होते. लहान मुलांच्या सगळ्याच बाळबोध प्रश्नांना मोठ्यांकडे उत्तर नसतं, कदाचित ते इतके मुळ प्रश्न असतात की ज्याकडे मोठ्यांचे ह्या पुर्वी कधी लक्षच गेले नसते. मग त्यांच्या ह्या प्रश्नांना आपण ‘बाळबोध’ असा एक मुलामा चढवुन स्वतःला त्यापासुन बचावुन घेतो. पण काही दिवसांनंतर त्या अनुत्तरित प्रश्नांची पुन्हा विचारणा होत नाही आणि मोठ्यांना वाटते दुर्लक्ष केल्यावर विसर पडला. पण प्रत्यक्षात ‘त्यांनी’ त्यांचे उत्तर शोधलेलं असतं.

संतपदाला प्राप्त न झालेले पण दैवी स्पर्शाच्या जवळ असणा-या ह्या दोन जमाती. प्रश्नांच्या जंगलात वाट काढणारे लहान आणि प्रश्नांच्या गर्तेतुन सुटलेले, थकलेले ‘निद्रिस्त’ मोठे. एक दैवी स्पर्शातुन येणारे आणि एक त्याच परतीच्या वाटेवरले असे दोन प्रवासी. एक उत्तर शोधणारे आणि एक उत्तर मागणारे. “ह्याची” एक टोक पकडायची धडपड; “त्याची” एक टोक सुटल्याने धडपड.

चिरनिद्रिस्त झाल्यावर त्यांच्या कपाळावर आठ्या जरी नसल्या तरी कधी कधी त्यांचे प्रश्न उरलेले असतीलच आणि ते इथपर्यंत पोहोचवण्याचे कधी वेगवेगळे मार्ग असतील आणि कदाचित त्यांतला हा एक मार्ग असला तर? अशाच शक्यतेतुन आणि कल्पनेतुन जन्माला आले ‘ग्रेव्हयार्ड..’ कसे आले....? कदाचित काही अज्ञातांचे प्रश्न ते माझ्यामार्फत सोडवु पाहात असावेत. ह्याचे संदर्भ, ठिकाण, नावं, कल्पना संपुर्ण काल्पनिक आहे वरपेक्षा त्या वैचारिक आहे.

एका वादळी समुद्राचा प्रवास जसा असतो तसाच हा प्रवास आहे. आत जातांना एक भिती असते आणि एकदा प्रवेश केला की प्रत्येक लाटेला रोमांच उभारणारा अनुभव. आताशा एक टप्पा पार करुन मध्यावरच्या एका बेटावर उभा आहे. पुढचा अर्धा प्रवास अजुन करायचा धीर होत नाही पण पलिकडे पोचण्यावाचुन गत्यंतरही नाही. असाच एक टप्पा जो पार झाला तो समोर आणतोय....... पुढचा टप्पा? तुम्ही माझ्यासोबत ह्या मधल्या बेटावर आल्यावर......

एकटाच मधल्या बेटावर आजुबाजुला थैमानी वादळात वाट पाहतोय..............

प्राजक्त

ज्या जमिनीवर ‘ग्रेव्हयार्ड’ उभारता आले त्या

“काव्यांजलीस”

आणि

ज्याच्या सोबत गप्पा मारत ‘ग्रेव्हयार्ड’ मध्ये शिरलों होतो त्या

“श्रीपाद”

या माझ्या मित्रास.......




समुद्राजवळच्या खडकावर बसल्याला
मला नेहमी वीसच मिनिटं व्हायची

आणि आई ओरडायची दोन तासापासून कुठे भटकतोय..

खालच्या लेन मध्ये एकमजली कौलारु व्हिलामध्ये
मार्थाआण्टी रहायची एकटी..
डुलत डुलत चालायची..
मी निरोप द्यायला गेलो की..
'कम सन कम..' म्हणत दोन इंग्लिश चॉकलेट द्यायची..
मला फक्त चॉकलेट आवडायची..

कधी कधी घंटा वाजवून पळून जायचो..
मला माहित असायचं
ती वरच्या मजली प्रेअर करत असेल..

ती रविवारी चर्चच्या मागे
तिच्या नव-याच्या थडग्याजवळ बसतसे..
मी ब-याचदा त्यावर खडूने काही बाही लिहितं..
"हाउ आर यु डिकास्टा?"
"यु आर लेझी स्लिपी गाय"

आई ओरडायची पण मार्था लिहु द्यायची..

एकदा शाळेतुन येताना घंटा वाजवुन पळालो..
पुढे तिला पेटीतुन नेताना पाहिले..
तिला मातीत गाडताना
'डिकास्टाच्या दगडा आडुन' पाहत होतो..

सगळे गेल्यावर खडू घेतला....

सॉरी !

आणि टकटक करुन पळालो...

---------------------




आई म्हणायची तरिही
शाळा सुटल्यावर चर्चच्या मागच्या ग्रेव्हयार्ड कडे...

रोजचा जणु शेवटला आणखी एक तास...
शांततेचा..

आम्हा सर्व ३-४ जणांचे ठरलेले ‘मित्र’ असायचे..
एनी ची मेरी
जॉई ची जेरी
जेसन ची रिटा
माझी मार्था अन डिकास्टा..
त्या त्या ठिकाणी आमची ‘खडूबाजी’

हिरवगार दिसणारं ग्रेव्हयार्ड..
उन्हाळ्यात अगदी भकास सुकलेलं...
सर्व दगडांवर सुकलेली वाण चढायचं

एकदा डिकास्टाच्या पुढे

✞ इन फोण्ड मेमरी ऑफ ✞
डिअर डिकास्टा
१८८०-१९५०

१९५० वर काट मारुन १९९० केले...

तिस-या दिवशी कोप-यावर
हिरवा कोंब उगलेला मी डोळ्याने पाहिला.....

-------------------




पोट पुढे अन खांद्यावरच्या पट्ट्या ओढत
वेलु ओरडायचा...
“यु लिटिल रास्कल..पुन्हा बागेत येशील तर
वाईनच्या यंत्रात टाकुन पिळुन काढेन..बाय गॉड !”

त्याची वाईन फॅक्टरीतले यंत्र
मला यंत्र कधीच वाटले नाहि..
रॉ....रॉ.... करणारे फादर पिटरच्या कथेतला डेविलच जणु..

तरी त्याच्या बागेतले फळ आम्ही चोरायचे सोडले नाही...

आमच्यावर पाळत ठेउन तो ग्रेव्हयार्ड मध्ये लपला...
आम्ही ती फळं थडग्यावर सजवत असलेला पाहुन..
निघुन गेला

तो ज्या थडग्यामागे लपला...
त्यावर सुध्दा फळं ठेवलेलीच होती

✝ इन मेमरी ऑफ ✝
सर माईकल व्ही.डी.
ग्रेट ग्रँडफादर ऑफ वेलु लूईस

थँक्स सर माईक

त्यानंतर तो कधी मागे लागल्याच आठवत नाही...

--------------------




कारण काही विशेष नव्हतं पण भांडण झालं....

मी रुसून

‘मिस रोझनच्या दगडा’वर जाउन बसलो...

पल्याड डावीकडच्या ‘ऍना मिसच्या भिंती’ मागे..

सुझन आणि मिखाईल एकमेकांना गुदगुल्या करत होते...

ऍनामिसचे थडगे सर्वात जुने आणि सर्वात मोठे...

दुस-या दिवशी मी सकाळी शाळेत जाताना



मिस युअर थ्रेटनिंग पावर हॅज गॉन विथ युअर हार्टबिट..
(मिस तुझा धाक तुझ्या ह्रदयाच्या ठोक्याबरोबर गेला...)



रात्री जेवताना डॅड आईला म्हणत होते..

‘मिसऍना’ ची भिंत पडली म्हणे...

खूप जूनी होती तशीही...

--------------------




खड्डे खंदणारा अब्राहिम
खंदताना सांगत होता...

जेनीअम्मा सिरिअस आहे...
कोणालाच ओळखत नाही...
मी जेनीआण्टीच्या घराकडे धूम ठोकली
जाता जाता....

"....थडग्याची भिंत मोठी ठेव रे !!

-------------------



पावसाळ्यात का कुणास ठाउक जरा भितीच वाटायची
फादरच्या कथेचे डेविल...
त्याची पोक निघालेली पाठ..
वाकडी काठी
भलं मोठं नाक...
कमानीगत टोपी...
आणि हे सगळं सावरत झाडावरून उडणं
सगळं अचानक खरं वाटायचं...

एकदा 'डिकास्टा' जवळ म्हणालो..



फादर इज बिग लायर.. ईजन्ट ईट...!



आणि लगेच चर्च मध्ये पळालो....

तिस-या मजल्यावरुन फादर बघुन किंचित हसले....
लाकडी कपाटातून..
तळकप्प्यातली जर्जर कागदावळ काढली....

त्यात १९६५ सालच कन्फेशन काढलं.

फादर
व्हेन यु टोल्ड अबाउट डेविल..
आय थॉट यु आर लायर...

- डिकास्टा

--------------------




मला लुई विनी ची ग्रेव्ह सर्वात आवडायची
सुंदर कोरीव काम करुन लिहिलेलं
आणि मध्यभागी

✝ द गाय व्हू डाईड ऑन हिज बर्थ डे ✝
लुई विनी
७ जून १९८५

मी नेहमी तिथे दोन क्षण जास्त राही
दुसरं म्हणजे माझासुध्दा बर्थ डे त्याच दिवशी

लुई ऑन दिस सेव्हंथ जून
शुड आय क्राय
ऑर ब्रिंग केक फॉर यू?
(लुई ह्या सात जून ला मी शोक करु की केक आणू?)

माईकल ने माझाच खडू घेउन शेजारी उजवीकडे खूण काढली
म्हणाला त्याच्या डोक्यावर असाच व्रण होता..

तितक्यात मागुन जॉईने घाबरवले आणि
मी दचकुन थडग्यावर......ओणवा

उजवीकडे खोच पडून रक्ताची धार...

रक्त थांबल्यावर माईकल म्हणाला
अरे अगदी असाच व्रण..

आता आरशात पाहिले की
स्मरते..

✝ द गाय व्हू डाईड ऑन हिज बर्थ डे ✝
लुई विनी
७ जून १९८५

पुन्हा लूई विनी कडे फिरकलो नाही

------------------




एल्विसचा मृतदेह परवा यार्डात सापडला...

सा-यांनाच बंदी...

आता लिहायच कसं..

आम्ही ठरवलं एका कागदावर लिहुन

सर्वात उंच चिठ्ठी चिकटवु डिकास्टाच्या...



यु ऑल विल मिस अस ना...? सि यू सुन !



चिठ्ठी लाऊन धुर्राराट पळालो...कुणी बघु नये म्हणुन
तिथल्या तुतीच्या झाडामागे लपलो...

प्रचंड हवा आली...पानं उडाली

आणि जेनीच्या तेलकट चेह-यावर एक कागद उडत येउन चिकटला

यु ऑल विल मिस अस ना...? सि यू सुन !

काही दिवस लिहणं बंद झालं...

--------------------



आठवडा झाला यार्डात पाऊल ठेऊन

शाळेत जाताना...गर्दी दिसे पोलिसांची

गर्दी आडुन लुई,डिकास्टा,मार्था,ऍना मिस...

....आणि

सिरिअस जेनी आण्टी जी कुणालाच ओळखत नव्हती

वारली

मी,ज़ोई,ज़ेसन,ऍनी

खिसाभर खडू घेउन

आनंद दडवून

पडल्या चेह-याने

फ्युनरलला....हजर

खडुस विलिसने हटकले

त्याला लहान मुलं फ्युनरलला आवडत नसे...

सगळे गेल्यावर आम्ही चौघांनी

एकावेळेस जेनीला विचारले...

नाउ यू रेकग्नाईज अस आण्टी...??? !

--------------------




दाढी मिशा डोक्यावर पटकुर
गळ्यात मोठा क्रॉस, जीर्ण जॅकेट
ठिगळधारी पँट, फ़रर...फ़रर...गमबुट
सदा मध्यभागी असलेल्या
मदरमेरीच्या पुतळ्याजवळ बसलेला..

**डी.एस.**

‘डी फॉर व्हॉट?, एस फॉर व्हॉट?’

आम्ही त्याला चिडवायचो...
तो नुसता मान हलवत हसे
अख्ख्या गावात कुणालाच ते माहीती नव्हतं...त्याच्या सहित

तो दिवसभर कागदावर काही बाही लिहुन हवेत भिरकवे
आणि संध्येला पुन्हा गोळा करुन...तोच धंदा

म्हणायचे...सर्वात पिटुकली ग्रेव्ह त्याच्या मुलीची होती

✝ ईन मेमरी ऑफ लिटल सॅमांथा ✝
मे १९५० - सप्टेंबर १९५०

पण त्याला कधीच त्या ग्रेव्हजवळ
आम्ही पाहिले नाही...

एनी त्यावर लिहे

फादर ईजण्ट ॲंग्री
डोण्ट क्राय यु आर २४, नॉट किड एनीमोर

--------------------




सुटीत ज्युडी दिदि आली होती....

खूप मस्ती ..

एकदा म्हणाली ..

जास्त मस्ती केली तर

ग्रेव्हयार्डात सोडेन हा एकट्याला...

--------------------




सुटीत आमच्या पतंगांना आपसुक वारं लागायचं
चौथ्या लेन मधली कार्टी शाळेच्या मैदानातुन..
आणि आम्ही सेकंडलेन वाली यार्डातुन..
सा-या आकाशाला रंगीत ठिगळ लागायचे

रोझी आजी तोंडावर हात ठेवुन दचकलीच
...’ओह जिझस...!’

आता उंच पतंग सोडायची म्हटलं की
ग्रेव्हवर चढणं आलंच...
त्यात काय एवढं...?

आमच्या सगळ्या पतंग कटल्या
उरली एकच, त्यांच्या दोन..
मी एका ग्रेव्हवर चढलो.....
आणि वा-याने उलटा जोर धरला..
क्षणात माझ्या पतंगाची

आकाशात हुकुमत...!

मी जिंकणं साहजिकच होत.....

✝ ईन मेमरी ऑफ ✝
एअर मार्शल विल्सन डिसुझा
वन व्हु युज टु टॉक विथ विंड

लव यू विली

--------------------




रात्री फिलिप गोष्टी ऐकवायचा....
डॅड म्हणत....“से ग्रॅंडपा यु...फुल...!”
“इट्स बिटवीन अस...फुल”...फिलिप (डोळा मारत)
त्यांच्या कथेतल्या मुलाचे नाव नेहमी माझ्या नावावरुनच...

बेन्सन...बेनी...!

आणि त्याला प्रत्येक वेळी मदत करणारा..डिवाईन जिब्रान
पांढरी दाढी, लांब झगा,
दैवी नजर, खांद्यापर्यंत केस....
“हे दॅट्स जिझस....राईट?”
“नो..हि इज नॉट...”
त्यांनी मला जिझस विषयी अशीच गोष्टीतून गोडी लावली....

“....आणि मग बेनी म्हणाला
जिब्रान तु गुहेतुन आण फुल
ज्यात आहे डेविलचा श्वास..
मी टेकडिवरुन बाबाला सोडवतो..
जिथे दरीत आहे डेविल्सची रास...”

डेविलचा धारदार आठवा हात
बाबाचं काळिज काढायला धजला
बेनी नं रोखली जादुई अंगठी
तेवढ्यात त्याचा तोल टेकडीवरुन ढळला.....”

आणि ज्याची भिती होती तेच झाले....
मी ऐकता ऐकता झोपी गेलो...

उठलो ते...सा-या घराच्या आक्रोशात..
बेनी तोल ढळला पण सावरला का ते न सांगता....

फिलिप गेला......!

✝ ईन लवली मेमरी ऑफ ✝
फिलिप....

त्यानंतर मी रोज लिहितोय

देन....?
देन....?
देन....?




एल्विसची डेड्बॉडी सापडल्यानंतर
बराच काळ तणावात गेला

समाजसेवा का काय ते तो करायचा...
मला तो शब्द कधी कळलाच नाही
पण चांगल काही तरी होत खरं....!

ब्लॅको, डिन, फेरो...ह्यांच्याशी त्याचा नेहमी वाद
ती तिघं वाईट होती..

आर.आय.पी.
एल्विस...
अ मॅन विथ कॉज....!

त्याचा भाऊ ब्रुस
नेहमी त्याच्या ग्रेव्ह जवळच बसायचा....

कधी कधी तो आम्हाला लिहिताना पाहुन म्हणे..
दे ऑल टॉक टु यु ईवन नाऊ.... अन्लकी वी..!
(ते अजुनही तुमच्याशी बोलतात..आम्ही मात्र अभागी..)

आर. आय. पी. म्हणजे..? मी
रेस्ट इन पीस....म्हणजे शांतता लाभो...ब्रुस सांगे....!

ब्रुस बरेच दिवस आला नाही...

काही दिवसांनी
आणखी दोन जणांचा खून झाला..

त्या दिवशी ब्रुस आला....

आणि त्याने मला एल्विसच्या ग्रेव्हवर लिहायला लावले...
मला अर्थ कळला नाही पण लिहिले......

ओन्ली
ब्लॅको ईज लेफ्ट
रेस्ट इन पिस...

(फक्त ब्लॅको उरलाय बाकी निद्रिस्त....)

--------------------




डी. एस.
काय लिहे पानांवर ही उत्सुकता आम्हाला
नेहमीच
पण त्याने कधी कळू दिले नाही...

एकदा तो झोपला असताना हळुच
डोक्याखालच्या वळकटीतुन पानं काढली
त्यावर फक्त नक्षी
आणि सर्वांवर तिच तिच...

।।।।।।।।।__।।।।।।।___।।।।___।।।___।

झोपेत डी. एस. बरळु लागला....

दे आर चेसिंग मी...
आय एम गिल्टी....!

मुर्ख जोईने आवाज केला...
डी. एस. दचकुन उठला..
सगळे सटकले
मी अटकलो...

तो म्हणाला..

'डोण्ट रन टु फास्ट, यु थिंक यु आर फास्ट
बट यु आर अलोन टु..'

आणि त्याने मला एक नक्षीचे पान दिले...

।।।।।।।।।__।।।।।।।___।।।।___।।।___।

नंतर एकदा कळालं...
तो शहरी मोठा व्यापारी होता...
समांधा वारली तरी त्याच्याकडे वेळ नव्हता...

--------------------



नोवा शाळेत बेलमन होता....
दर तासाला हातामधला चिंचोळा दगड घेऊन
लटकत्या लोखंडी तुकड्याला मारणे त्याच काम....

सरकारी कार्यालयाच्या घंटाघरात टोल पडले की
की हा ह्याचे लटपट पाय सावरत घंटा देत....

आम्ही कधी कधी त्याचा चिंचोळा दगड पळवत...
तो हातानेच चपापत
मग पायातला कडक बुट काढत
मागच्या जाड सोल ने वाजवत
'...लिट्ल रास्कल्स !'

तो आवाज मजेशीर निघे
फड्क.....टण्ट्ण.... टण्ट्ण....

तो दगड हातानेच चपापे...
कारण तो ठार अंध होता...

एकटा शाळेमागे राही....

एकदा शाळेची बेल झाली नाही
सगळा कारभार सरकारी घंटाघरानुसार...

✞ ईन मेमरी ऑफ ✞
बेलमन नोवा
व्हु केप्ट टाईम इन हिज हॅण्ड

आम्ही त्याच्या ग्रेव्ह वर तोच
चिंचोळा दगड ठेवला...
आणि दोन गोल काढले

⊙ ⊙

सी.......... !

वी केप्ट युवर स्टोन बॅक

-------------------------




आम्ही थडगी मोजायला सुरुवात केली...
किती तरी वेळा

अन दरवेळी नवा अनुभव

परत...मी मोजदाद करत
पार टोकाला पोचलो...
शेवटच्या थडग्याजवळ...

डी. एस. ने एक पान माझ्याकडं सरकवलं

||| || प्राइसलेस थिंग्स कॅन नॉट बी काउंटेड || |||

जेसन ऑरडला ७०.... नाही ७५
जॉई म्हणाला ६९ कधी ७०
एनी तिस-या कोप-यावरुन ....६५ कन्फर्म

आता तिघांचा रोख माझ्याकडे

काउंटलेस.......!!!

--------------------



ट्ण्ण ट्ण्ण.....ट्ण्ण....

चालत चालत शाळेजवळ आलो...
शाळेची घंटा मुलांच्या आनंदासारखी अनावर
आणि मी प्रत्येक टोल्यासरशी भानावर...

दिसत गेले..

वेलुचे वाईनयार्ड जो वेलींनी वेढलेला
डिकास्टा मार्थाचा एक मजली व्हिला
जेनी आंटीच घर जी शेवटी सार विसरली
एल्विस आणि त्याचा भाऊ खडुस विलिसच बसकं घर
जोई जेसन एनी सोबतचा कट्टा....चाकामधलं घंटाघर

चालता चालता...
मधल्या लेनच्या एका टोकावर आलो...
डावीकडे वेलींनी वेढलेला माझा जुनाट कौलारु व्हिला...
आणि उजवीकडे बोर्ड

‘वे टु मदरमेरी चर्च ॲण्ड ग्रेव्हयार्ड’
अजुन बरेच जण वाट बघत होते....

मी श्वास रोखला
आणि गळ्यातला क्रॉस घट्ट धरला.....

✠✠✠✠✠✠✠

# वे टु मदरमेरी चर्च ॲण्ड ग्रेव्हयार्ड

Stunned.....
प्रत्येक ठिकाणी वातावरण जिवंत केलंस. इतकी जबरदस्त कविता अशा स्तरावर, अशा वेगाने आणि इतकं भान हरवल्यासारखी लिहीत असताना तुझं भान पक्कं होतं. यु आर मास्टर ब्लास्टर. अजून लिहीत रहा. पूर्ण होऊ दे.
"त्यानंतर मी रोज लिहितोय देन? देन? देन? ......."......Its a Sixer...a grand grand Sixer
- नाम गुम जायेगा (श्री.सुनिल सामंत), ठाणे

सतत असे मनो विश्लेषणात्मक लिहिणे ते ही इतक्या ताकदीने. कठीण आहे. खरे सांगू कितीदा वाचले तरी त्यातील गूढ शमतच नाही, अचाट अफाट, काय आहे काय हे? मती सुन्न करणारे, प्रत्येक चित्रात त्याची परिणामकता तितकीच भयानक, बालमनावर ओढले गेलेले ओरखडे असे कवितेतून प्रसवत आहेत, दुर्दैवाने जे प्रसवत आहे ते रक्तच आहे, अश्रु नाहीत असे वाटते.
- पुनश्च हरी, (श्री.विजयकुमारजी कानसे), मुंबई

तु वेडा आहेस, each grave has it's own story...has it's own soul....very touching....it's keeping me on my toes....can't guess what will you be writing next...proud of u...
Retribution...Let him rest for eternity....I have started beliving that I am also one of the kids writting on the graves, insane....insane people can only create such kinda master piece.
"तिस-या दिवशी कोप-यावर हिरवा कोंब उगलेला मी डोळ्याने पाहिला".....आआआआईईईईईचचचच्च......अरे चांगले शब्दच येत नाहित तोंडात खुप त्रास झाला वाचुन.... प्राजक्त एक न एक कविता वाचुन काढली....तुझी कविता एक काव्यमाला होतेय....खुप सुंदर....प्रचंड त्रास झाला वाचुन....अजुनही होतोय....
staaaaaaaakkkkkkkkkk....... कॅनव्हास वरचा एक फटकारा काळ्या रंगाचा.... "रेकग्नाईज"
"देन? देन? देन?" ......मी तुला विचारतोय बेनी.... देन? देन? देन? ......लवकर सांग....
I wont run fast D.S. .......I wont get busy also.....keep giving me the torn pages.....
- शांतनु चंद्रात्रे, नाशिक

काय सही लिहितो तु, शप्पथ, महान, out of box लिटरेचर वाचायला मिळतेय.
BEST
- भक्ती जामगांवकर, अहमदनगर

प्राजक्त, मी हा थ्रेड सहा वेळा वाचला आहे आणि दरवेळी एकच परिणाम...डोकं सुन्न होतं ! अफाट लिहितोस तू....प्रत्येक वेळी एखाद्याच शब्दाचा मार जिव्हारी बसतो आणि जिवघेणा परिणाम करतो. सी यु सुन, रेकग्नाईज, डोण्ट क्राय, देन...? ---- सगळंच कल्पनेच्या बाहेरचं आहे. अंगावर येतं, डोक्यात भिनतं. SIMPLY GREAT !!!
- प्रतिमा राठी, जुन्नर

Getting involved in the story...awaiting for the next post....It's too touchy.... specially "see you soon" amd "Recognised"
- पल्लवी

This series is taking me away from me and I am going near to that Graveyard !! with your friends !
- किरण गोडबोले

सलग वाचत होते म्हटलं नंतर रिप्लाय लिहावा पण ईथे थांबले, Don't run too fast... प्राजक्त खुप छान लिहिलयसं. एक अफाट नरेशन पॉवर आहे तुझ्यात, फार शब्दांचा, उपमांचा गाजावाजा न करता सरळ साधं खोल आरपार घुसणारं.. प्रणाम !
- दिपा मिट्टीमनी, कॅनडा

प्राजक्त, जबरदस्त लिहिलयस...एखाद्या abstract painting सारखे खुप काही सांगुन जाणारे, ह्या सगळ्या कविता बीटवीन दी लाईन च आहेत...
“तिस-या दिवशी कोप-यावर हिरवा कोंब उगलेला मी डोळ्याने पाहिला”....... Ultimate... प्रतीकातून प्रचिती
“थडग्याची भिंत मोठी ठेव रे......”...... mischievous childhood with......
- मुक्ता पाठक शर्मा, सिंगापूर

काय लिहिलयंस यार....आतुन बाहेरुन ढवळून काढतोस.....
का माहित नाही पण हा थ्रेड मी सारखा उघडून वाचतो आहे....काही तरी आपल्या बाबतीत घडल्यासारखे वाटते आहे संदर्भ जरी वेगळे असले तरी....
- अनिल बिहाणी, चिंचवड

खुपच छान आहेत, खरं सांगू कधी ग्रेव्हयाड्र्मध्ये प्रत्यक्षात गेले नाही पण ... आता मलाही खडू हवा आहे, प्रत्येक व्यक्तिरेखेचं चित्रण जबरदस्त आहे.
- प्रिती जंगम, पुणे

Simply Great.... How can you imagine these things dear?.... You must be having the sixth sense and also the way to heart of the Graveyard People.... You are really great ....May God Bless you with a Divine Heart.....
- शुभांगी

हे सगळं मला इतक्या उशिरा वाचायला मिळतयं इतकीच खंत....बाकी कविता सुन्न करणा-या आणि मती गुंग करणा-या आहेत....
- रमेश ठोंबरे, औरंगाबाद

आज प्रथमच हा थ्रेड मी चेक केला आणि आतापर्यंतच ग्रेव्हयार्ड लिटरेचर वाचलं...प्रतिक्रिया द्यायला शब्दच नाहीत, जबरदस्तच.....
- मिनल जोशी, डोंबिवली

प्रत्येक रचना केवळ अप्रतिम, शब्दच नाहीत, प्रत्येक कविता पुन्हा पुन्हा वाचावीशी वाटणारी, विशेषतः शेवट, वाचायला सुरु केली की वाटत राहते आता हि शेवटच्या तीन चार ओळीत कुठले वळण घेणार? आणि प्रत्येक वळण अनपेक्षित तरी तितकेच सुंदर.... अजुन येउ देत...........
- राज

हे काहीतरी प्रचंडच अफाट आहे पुन्हा एकदा वाचल्याशिवाय प्रतिसाद देणे अशक्य....
- आसावरी केळकर वाईकर, चेन्नई

हा थ्रेड म्हणजे शहा-यांचा कारखाना आहे !!
- चिराग पत्की, पनवेल

असच चालु राहु दे...अफ़लातून आहे...प्राजक्त तू अस काही लिहू शकतोस याची पुनश्चना शंका वाटते मला नाही कारण मी तुला प्रत्यक्ष ऐकले आहे...अगदी नाटकाप्रमाणे वाटतयं सुंदर...शेवटी कुसुमाग्रजांच्या भुमीतले तुम्ही....असे लिहिलेस तर काय नवल ! Keep it up !!!
- कौस्तुभ आपटे, डोंबिवली

ब-याचदा वाचले...पुन्हा पुन्हा...पण प्रतिक्रिया काय द्यावी हे कळत नाहियं...पण जे काही मांडतो आहॅस प्राजक्त ते एकदम सकस आहे Keep it up.
- रुपेश गांधी, डोंबिवली

हा थ्रेड वाचताना अस वाटतं....वाटतं आपण कुठल्यातरी विचारांच्या जगात आहोत....आणि...आणि मधेच कुणीतरी अचानकपणे सनदिशी कानाखाली वाजवल्यासारखं वाटतं....प्राजक्त तू खुपच सही लिहितो आहेस... अप्रतिम....

- परेश चाफे, मुंबई

ग्रेव्हयार्ड लिटरेचर वाचताना चित्र डोळ्यासमोरुन सरकत जातात...

- साक्षी सुर्वे, मुंबई

Superb !!!

- वृषाली घाडगे, मुंबई

आईशप्पथ !! जबरदस्त चाललयं हे....
“त्यानंतर मी रोज लिहितोय देन? देन? देन?”
मारलंस रे...काळजात सुरा खूपसून मारलंस.....
“तो शहरी मोठा व्यापारी होता...समांथा वारली तरी त्याकडे वेळ नव्हता”
परत मेलो.....

- आल्हाद महाबळ, मुंबई

मी थांबलो होतो पुढच्या कवितांसाठी....एकदा सगळ्या वाचूनच रिप्लाय द्यावा म्हनुण....पण छे राहावतच नाहिय मला....जब्बर.... really “out of the box”.....काटे आले अंगावर...प्रत्येक कवितेमागे एक.... so Benny.... Then? Then?? Then???

- हर्षद कुळकर्णी, पुणे

सुन्न

- मित्र रवी, कोपरखैरणे

आज सातव्यांदा वाचलं मी पुन्हा trans.................... !! अप्रतिम!!

- कल्पी जोशी, चंद्रपूर

PRAJ.....
“Tha Man who killed thousands,
Eachone thousand times”

- अभिषेक सामंत, अर्नाळा

खुप धावल्यावर धाप लागते.... श्वास विस्कटतों...
मागे कापलेलं अंतर पाहुन हायस वाटतं
आणि
पुढे अंतर कापायच्या आधी पुन्हा विस्कटलेला श्वास एक करावा लागतों...

# ‘तों’

अजुन विस्कटलेला श्वास एकजीव करतोय “क्रॉस घट्ट धरुन”

तुर्तास........

**ग्रेव्हयार्ड लिटरेचर पुर्वाधाची ‘कॉफिन’ बंद**

